**सहाय्यक अनुदानाच्या जलद संवितरण व संनियंत्रणासाठी आहरण व संवितरण अधिकारी यांना आभासी वैयक्तिक ठेव लेखा (Virtual Personnel Deposit Account) ही व्यवस्था व कार्यपध्दत लागु करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**(आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)**

**शासन निर्णय क्र.आभासी ठेव/ प्र.क्र६८/२०२४/ आव्यप्र-१,**

दिनांक ०९.०८.२०२४

**संदर्भ** :-१. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११०/२०२३/कोषा.प्रशा ५, दि.१४/२/२०२४

२. वित्त विभाग, मा.सचिव, लेखा व कोषागारे यांचेकडील अ.शा.पत्र क्र.२४६, दि.२८/०५/२०२४

**प्रस्तावना :-**

आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना आणि अन्य अशासकीय कार्यान्वयन प्राधिका-यांना महाराष्ट्र कोषागार नियम नमुना क्र.४४ देयकांदारे राज्याच्या एकत्रित निधीतून २७ - लहान बांधकामे ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर), ३३- अर्थसहाय्य, ३५- भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान, ५०- इतर खर्च, ५३- मोठी बांधकामे आणि वित्त विभागाव्दारे वेळोवेळी घोषित करता येतील अशा अन्य उद्देश शीर्ष (Object Head) अंतर्गत आहरित केल्या जाणाऱ्या सहाय्यक अनुदानाच्या निधीचा विनियोग करण्यासाठी “आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक “Virtual Personal Deposit Account Administrator (VPDAA)" ही व्यवस्था व कार्यपध्दती संदर्भ क्रमांक. १ चे शासन निर्णयान्वये अंमलात आणली आहे.

सदर "आभासी वैयक्तिक ठेव लेखा” या व्यवस्थेची यशस्वीपणे अंमलबजावणी पथदर्शी प्रयोगाकरिता निवडण्यात आलेल्या कार्यालयांनी केली आहे. शासन निर्णयातील मुद्दा क्र.६ नुसार सदर प्रणाली पथदर्शी अंमलात आणल्यानंतर अन्य सर्व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना आणि अशासकीय कार्यान्वयन यंत्रणांना सहाय्यक अनुदानाच्या निधीचा विनियोग करण्यासाठी "आभासी वैयक्तिक लेखा" या व्यवस्थेचा आणि कार्यपध्दतीचा

अवलंब करणे अनिवार्य आहे. त्यानुषंगाने शासन निर्णयात नमूद उद्दिष्ट्य लेखा शीर्षाखाली (Object Head) अनुदान आहरीत करणाऱ्या आहरण व संवितरण अधिकारी आणि प्रशासकीय कार्यन्वयन यंत्रणांनी शासन निर्णयातील मुद्दा क्रमांक ११.१ व ११.२ प्रमाणे संबधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी वित्त विभागाच्या संमतीने तसेच महालेखापाल, (ले. व ह.) कार्यालय यांच्या मान्यतेने शासन निर्णयाद्वारे "आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक Virtual Personal Deposit Account Administrator (VPDAA)" घोषित करणे या कार्यपद्धतीचा अवलंब करणे बंधनकारक आहे.

त्यास अनुसरुन आपत्ती व्यवस्थापन कार्यक्रमासाठी २२४५- नैर्सगिक आपत्तीच्या निवारणसाठी सहाय्य ३१, सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखालील देयकांसाठी महसूल व वन विभागाचे अधिनस्त मंत्रालय स्तरावरील आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणासाठी लेखाधिकारी तथा आहरण व संवितरण अधिकारी यांना “आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक” [Virtual Personal Deposit Account Administrator] म्हणून घोषित करणे विचाराधिन होते.

**शासन निर्णय :-**

उक्त प्रस्तावनेमध्ये नमूद वस्तुस्थितीच्या पार्श्वभूमीवर आपत्ती व्यवस्थापन कार्यक्रमासाठी २२४५- नैर्सगिक आपत्तीच्या निवारणसाठी सहाय्य ३१, सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखालील देयकांसाठी महसूल व वन विभागाचे अधिनस्त मंत्रालय स्तरावरील आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणासाठी लेखाधिकारी तथा आहरण व संवितरण अधिकारी यांना “आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक” [Virtual Personal Deposit Account Administrator] म्हणून घोषित करण्यात येत आहे.

प्रस्तुत शासन निर्णय महालेखापाल-१ (ले. व अ.), महाराष्ट्र, मुंबई यांनी त्यांच्या पत्र क्रमांक TM/Ch २/UOR no. ६९/L&JD/२०२४-२५/५४२, दि. ३१.०७.२०२४ आणि कोषा प्रशा.५ यांच्या दि. १९.०६.२०२४ रोजीच्या मान्य टिप्पणी अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन आणि कार्यासन व्यय- ९ यांनी त्यांच्या अनौपचारिक संदर्भ अनो सं क्र १४६/२०२४/को प्र-५, दि. १४.०६.२०२४ अन्वये सहमतीने सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०८०९१३२७३७७०१९ असा आहे. प्रस्तुत शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN CHANGDEO KOLHE

Digitally signed by ARUN CHANGDEO KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=5954cbf120ac1f332056b65de0d4dfa85b619ad7d64fcd736ceb3dee77603425, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7AB6FCE2D956CE4C6E9BFC3EA1AB5FC2F17BEA07DB8AF21ACA4BEDED302CE9F9, cn=ARUN CHANGDEO KOLHE
Date: 2024.08.09 13:42:21 +05'30'

**( अरुण कोल्हे )**

**शासनाचे सहसचिव तथा वित्तीय सल्लागार,**

**प्रत:-**

१. प्रधान सचिव, (आ.व्य., म. व पु.), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान महालेखापाल (लेखा व परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
३. संचालक, आ.व्य. प्र., महसूल व वन विभाग मंत्रालय, मुंबई.
४. वित्तीय सल्लागार सहसचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. कार्यासन अधिकारी / लेखाधिकारी रोख शाखा महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. लेखा अधिकारी वर्ग - २ आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती